**राखीव वनाचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सिमांकन योजनेंतर्गत सन २०२४-२५ करिता निधी वितरीत करण्याबाबत.. (४४०६-००५३).**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०२४/प्र.क्र.२०६/फ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : १९ ऑगस्ट, २०२४.

वाचा :-

१. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/ प्र.क्र.३४/अर्थ-३, दि. १.०४.२०२४ व दि. २५.०७.२०२४.

२. अपर प्रधान मुख्य वनंसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे दि.९.०५.२०२४, दि.११.०६.२०२४, दि. १८.०६.२०२४ व दि. २३.०७.२०२४.

३. शासन निर्णय समक्रमांक दि. २.०७.२०२४ व शासन शुध्दीपत्रक समक्रमांक दि. ३.०७.२०२४.

**प्रस्तावना :-**

"राखीव वनाचे सर्व्हेक्षण, जमाबंदी व सीमांकन" (४४०६ ००५३) या राज्य योजनेअंतर्गत सन २०२४-२५ साठी एकूण रु. १३८०९.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. आता, बी.डी.एस. (BDS) प्रणालीप्रमाणे एकूण रु. ३१०४.७२ लक्ष निधी उपलब्ध आहे.

२. प्रस्तुत योजनेअंतर्गत एकूण रु. २०७६.७७ लक्ष निधी मागणीचा प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर यांनी संदर्भ क्र.२ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे.

३. वित्त विभागाच्या दिनांक १.०४.२०२४ व दिनांक २५.०७.२०२४ च्या परिपत्रकान्वये वित्तीय वर्ष सन २०२४-२५ करिता विभागास आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा निधी बीम्स प्रणालीवर वितरीत करण्याच्या अनुषंगाने सूचना दिल्या आहेत. सदर परिपत्रकानुसार ०२- मजूरी व **२७-** लहान बांधकामे या उद्दिष्टांसाठी उपलब्ध निधी / लेखानुदानाच्या १०० टक्के तरतूद उपलब्ध करण्यात आली आहे तर ५३- मोठी बांधकामे उपशिर्षांतर्गत सुधारित अंदाजाच्या मर्यादेत निधी वितरीत करण्यास नियोजन व वित्त विभागाची मान्यता आवश्यक असल्याचे नमूद केले आहे.

४. आता, वित्त विभागाच्या उक्त परिपत्रक व उपलब्ध निधी विचारात घेता, ०२- मजूरी व **२७-** लहान बांधकामे या उपशिर्षांतर्गत बी.डी.एस. प्रणालीवर एकूण रु. २१०४.७२ लक्ष निधी उपलब्ध आहे. तर प्राप्त प्रस्तावांपैकी परिपूर्ण प्रस्तावांमधील ०२- मजूरी व **२७-** लहान बांधकामे या उपशिर्षांतर्गत मागणी केलेल्या एकूण रु. ६५५.०४ लक्ष (३०२.९० + ३५२.१४) निधीपैकी रु. ३६६.८९ लक्ष (१२२.२९ + २४४.६) निधी संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला असून उर्वरित एकूण २८८.१५ लक्ष (०२- मजूरी - रु. १८०.६१ + २७-लहान बांधकामे -रु. १०७.५४ लक्ष) निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे

नमूद करण्यात येते की, ५३- मोठी बांधकामे या उपशिर्षांतर्गत प्राप्त मागणीच्या प्रस्तावानुषंगाने नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेअंती निधी वितरीत करण्यात येईल.

**शासन निर्णय:-**

सन २०२४-२५ करिता "राखीव वनाचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन" (४४०६ ००५३) या योजनेअंतर्गत उपलब्ध निधीतून एकूण रु. २८८.१५ लक्ष निधी पुढील तपशिलानुसार तसेच अटींच्या अधीन राहून खर्च करण्यास मंजूरी देण्यात येत आहे:-

**(रक्कम रु. लाखात)**

| अ.क्र | वनवृत्त | वन विभाग | कामाचा तपशिल | ०२-मजूरी | २७ - लहान बांधकाम | वितरित रक्कम |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | **पुणे** | जुन्नर | वर्ग १ व २ चे पिलर्स उभारणे, DGPS सर्व्हे करणे | २६.७८ | ५३.५६ | ८०.३४ |
| २ | **अप्रमुव (वन्यजीव) पश्चिम मुंबई** | वन्यजीव पुणे | DGPS सर्व्हे करणे | ६१.११ | ० | ६१.११ |
| ३ | कोल्हापूर | सावंतवाडी | | ६५.७३ | ० | ६५.७३ |
| ४ | नागपूर | वर्धा | वर्ग १ व २ चे पिलर्स उभारणे | २६.९९ | ५३.९८ | ८०.९७ |
| | **एकूण** | | | १८०.६१ | १०७.५४ | २८८.१५ |

१) ज्या प्रयोजनासाठी खर्चास मंजूरी देण्यात आली आहे, त्याच प्रयोजनावर निधी खर्च करण्यात यावा

२) या मध्ये कोणत्याही प्रकारची वित्तिय अनियमितता होणार नाही, याची पुरेपूर दक्षता घेण्यात यावी.

३) वित्त विभागाने दि. ११/७/२००१ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या वित्तिय मर्यादा यापुढेही लागू राहतील.

४) सदर मान्यता ही आर्थिक वर्ष २०२४-२५ या कालावधी करिताच देण्यात येत आहे. वित्त विभागाच्या परिपत्रक दिनांक १.०४.२०२४ मधील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे तसेच सदर निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च न होता अधिनिस्त क्षेत्रिय अधिकारी/ मंडळे/ महामंडळे यांच्या बँक खात्यात, स्वीय प्रपंजी खात्यात अथवा शासकीय लेख्याबाहेर ठेवता येणार नाही.

५) सदर बांधकाम करताना वन (संवर्धन एंव संरक्षण) अधिनियम, १९८० चा भंग होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

६) खर्चाच्या अनुषंगाने उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

७) आर्थिक वर्षाअखेर वितरीत निधी आर्णि अखर्चित निधीची पडताळणी करण्यात अखर्चित निधी तातडीने शासनखाती जमा करण्यात यावा.

८) निधी वितरीत करताना प्रस्तुत कामे दुबार होत नसल्याची खातरजमा करावी.

२. सदर खर्च हा मागणी क्रमांक- सी-१०, ४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च राज्य योजनांतर्गत योजना वनाचे सर्वेक्षण, जमाबंदी व सिमांकन (४४०६-००५३) या शीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०२४-२५ मध्ये मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. निधी खर्च करताना वित्त विभागाने मासिक निधी विवरणपत्र तसेच इतर बाबतीत दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

३. सदर शासन निर्णय शासन निर्णय क्रमांक वि.अ.प्र.-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम/भाग-२, दिनांक १७/४/२०१५ भाग पहिला उप विभाग-३ परिच्छेद २७ (२) अन्वये व वित्त विभागाच्या परिपत्रक दिनांक १.०४.२०२४ व दिनांक २५.०७.२०२४ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८१९१६४९४३४७१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

APARNA SUHAS UPASANI

Digitally signed by APARNA SUHAS UPASANI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=130a2ee40839d75ff18e93244499097828091ef8e09f856d6e8f0c403254f40a,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=00DDF81FCF3DFD3E814E1C6D5D5D1249D28D65601EB04ECDFF837C158CB2ED4C, cn=APARNA SUHAS UPASANI
Date: 2024.08.19 17:05:20 +05'30'

(अपर्णा उपासनी)
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव पश्चिम), मुंबई.
६) मुख्य वनसंरक्षक (प्रा.), पुणे /नागपूर/कोल्हापूर.
७) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख कक्ष), नागपूर.
८) उप वनसंरक्षक (वन्यजीव), पुणे.
९) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
१०) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
११) वित्त विभाग, व्यय १०/ अर्थसं-६ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१२) कार्यासन अधिकारी (फ-२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३) कार्यासन अधिकारी, ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१४) निवडनस्ती, कार्यासन (फ-३), म.व व.वि., मंत्रालय, मुंबई-३२.